कैद्यांसाठी आयोजित कार्यक्रमांच्या खर्चास
वित्तीय मान्यता देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग

**शासन निर्णय क्र. संकीर्ण ८२२५/प्र.क्र.३४१(ई.न.९७५२०६)/सां.का.४**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २८ मार्च, २०२५

संदर्भ :- पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय, क्र. संकीर्ण ८२२५/ प्र.क्र.३४१(ई.नं.९७५२०६)/सां.का.४, दि. १४ फेब्रुवारी, २०२५.

**प्रस्तावना :-**

राज्यभरातील जिल्हा कारागृहात बंदिस्त असलेल्या कैद्यांना विकासाच्या मुख्य प्रवाहात आणण्याकरीता जिल्हा कारागृहात बंदिस्त असलेल्या कैद्यांमध्ये राष्ट्रप्रेम जागृत करणाऱ्या, कैद्यांच्या सुप्त कलागुणांना वाव देणाऱ्या प्रबोधनात्मक स्वरुप असणाऱ्या कार्यक्रमाचे आयोजन राज्यातील ३६ जिल्ह्यातील कारागृहांमध्ये बंदिस्त कैद्यांसाठी होणाऱ्या कार्यक्रमाच्या खर्चास उपरोक्त संदर्भाधीन शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. आता, त्यास वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील ३६ जिल्ह्यांमधील कारागृहांमध्ये होणाऱ्या विविध कार्यक्रमांसाठी खालीलप्रमाणे रुपये १,०८,००,०००/- (रुपये एक कोटी आठ लाख फक्त) इतक्या रकमेस या शासन निर्णयान्वये वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

**कार्यक्रम खर्चाचा तपशील**

| अ.क्र. | बाब | अंदाजित खर्च |
|---|---|---|
| १. | कलाकार मानधन, भोजन, निवास, प्रवास, ध्वनी, अल्पोपहार यासह एकत्रित मानधन | ३,००,०००/- (प्रति जिल्हा) |
| २. | ३६ ठिकाणच्या कार्यक्रमास रुपये ३,००,०००/- प्रमाणे एकूण | १,०८,००,०००/- |

सदर कार्यक्रमाचे स्वरुप खालीलप्रमाणे :-

| | |
|---|---|
| ठिकाण | जिल्हा मध्यवर्ती कारागृह (सर्व ३६ जिल्हे) |
| स्वरुप | बंदिस्त स्वरुपात |
| कार्यक्रम उदघाटन | जिल्हाधिकारी व जिल्हा पोलीस अधीक्षक यांच्या हस्ते |
| प्रमुख पाहूणे | १ जिल्हा कारागृह प्रमुख<br>२ सामाजिक क्षेत्रातील मान्यवर / ज्येष्ठ समाजसेवक<br>३ जिल्ह्यातील ज्येष्ठ पत्रकार<br>४ शिक्षण / व्यवसाय / रोजगार क्षेत्रातील ज्येष्ठ |
| कार्यक्रम वेळ | साधारण ३.०० तास (एकाच वेळी सर्व नियोजित ठिकाणी ) |
| सहभागी कलाकार | सांस्कृतिक कार्य विभागाद्वारे निवड केलेले कलाकार व जिल्हा कारागृहात बंदिस्त असलेले कैदी आपली कला सादर करु शकतात. |

०२.  सदर खर्च लेखाशिर्ष मागणी क्र. झेडडी-२, २२०५ कला व संस्कृती, पंचवार्षिक योजना अंतर्गत योजना, राज्य योजनांतर्गत योजना (०२) (०२), राज्य, नृत्य, नाटय, तमाशा व संगीत महोत्सव (२२०५ १५०७) - ५० इतर खर्च (कार्यक्रम) या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या वर्षासाठी मंजूर असलेल्या आर्थिक तरतुदीतून भागविण्यात यावा.

०३.  यासाठी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना नियंत्रण अधिकारी तसेच लेखाधिकारी, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

०४.  सदर खर्च वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-३, अ.क्र. ४ परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकारानुसार मंजूर करण्यात येत आहे.

०५.  सदर प्रकरणी वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि. २५ जुलै, २०२४ व १२ फेब्रुवारी, २०२५ मधील सर्व परिच्छेद परीशिष्टातील अटींनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांची राहील.

०६.  सदर शासन निर्णय वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्र. २२२/२०२५, व्यय १५, दि. २६/०३/२०२५ अन्वये मान्यता देण्यात आली आहे.

०७.  सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०३२८११५७३३७८२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

BALASAHEB
ISHWAR SAWANT

Digitally signed by BALASAHEB ISHWAR SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=79fcecc76dd8693a7bfcec682ee63eee2edaf06ba586ac71715d8e6ba4d62fbe, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=327FE83917B9691D96F2C6AEB03B51A86A595CCAC9264923EA4CD090FFD03E83, cn=BALASAHEB ISHWAR SAWANT
Date: 2025.03.28 11:58:28 +05'30'

**( बाळासाहेब ईश्वर सावंत )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
२. मा. अपर मुख्य सचिव (सांस्कृतिक कार्य) यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
३. उप सचिव ( सां.का.४ ) यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
४. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, जुने सचिवालय इमारत, एम.जी. रोड, मुंबई ४०० ०३२

५. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
८. महालेखापाल (लेखा परीक्षा) - १ महाराष्ट्र, मुंबई
९. महालेखापाल (लेखा परीक्षा) - २ महाराष्ट्र, नागपूर
१०.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) - १ महाराष्ट्र , मुंबई
११.महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता) - २ महाराष्ट्र, नागपूर
१२.निवड नस्ती, सां.का.४